**छत्रपती राजर्षी शाहू महाराज यांच्या जयंतीनिमित्ताने आयोजित सांस्कृतिक कार्यक्रमाच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.४४४/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-** १. सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र.सां.का.सं/ ४०६५, दिनांक २० जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

छत्रपती राजर्षी शाहू महाराज यांचे कार्य बहुविध अंगाचे आहे. त्यांनी वेगवेगळ्या क्षेत्रामध्ये अनेक क्रांतिकारक निर्णय घेऊन कार्यक्रम/ योजना/उपक्रम राबविले होते. त्यांची दुरदृष्टी व कल्पकता यामुळे महाराष्ट्राच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक क्षेत्रात मोठ्या सकारात्मक घडामोडी घडलेल्या आहेत.

समाजकार्य, अस्पृश्यांच्या उध्दारासाठी त्यांचे कार्य, पुरोगामी महाराष्ट्राचा विचार आणि त्यानुसार त्यांनी केलेला राज्याकारभार, कुस्ती सारख्या खेळाला त्यांनी दिलेला राजाश्रय तसेच संगीत व पारंपारिक लोककलेला त्यांनी दिलेले प्रोत्साहन असे विविध पैलू असलेला रयतेचा कैवारी असलेला राजा म्हणून राजर्षी शाहू महाराजांचा लौकिक होता.

छत्रपती राजर्षी शाहू महाराज यांचा जन्म दिनांक २६ जून, १८७४ रोजी कोल्हापूर येथे झाला. चालू वर्ष हे राजर्षी शाहू महाराजांचे स्मृती शताब्दी वर्ष असून त्यांच्या जयंतीस १५० वर्षे पूर्ण होत आहेत. याचे औचित्य साधून राजर्षी शाहू महाराज यांच्या जयंतीच्या पूर्वसंध्येला म्हणजेच दिनांक २५ जून, २०२३ रोजी केशवराव भोसले नाट्यगृह, कोल्हापूर येथे विशेष सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले होते. या प्रित्यर्थ झालेल्या कार्यक्रम व त्यावरील आयोजन खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राजर्षी शाहू महाराज यांच्या जयंतीच्या पूर्वसंध्येला म्हणजेच दिनांक २५ जून, २०२३ रोजी केशवराव भोसले नाट्यगृह, कोल्हापूर येथे विशेष सांस्कृतिक कार्यक्रम व आयोजनाकरीता रुपये १२,१०,५००/- (अक्षरी रुपये बारा लाख दहा हजार पाचेश मात्र) इतक्या खर्चाच्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडड-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम)

(२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८०३१७५७५५६५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.08.04 18:43:13 +05'30'

**( अनिरुद्ध सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई

९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४.